**महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (प्रशासन शाखा) मधील विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य या पदावर नियुक्ती..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रिक्तप २०१३/(१५३/१३)/मशि-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२
तारीख: दिनांक : १३ ऑगस्ट, २०१४

<u>वाचा</u>

संदर्भ :-विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण पदावर नियुक्तीसाठी मुलाखती घेवून शिफारस करण्यासाठी शासन निर्णय दि.२४.११.२०१० अन्वये गठीत समितीच्या दिनांक २१ व २२ मे,२०१४ रोजीच्या बैठकीतील शिफारशी.

**<u>प्रस्तावना</u>**

विभागीय सहसंचालक पदाचे सेवाप्रवेश नियम अद्याप अंतिम झाले नसल्याने प्रस्तावित सेवाप्रवेश नियमांच्या आधारे विभागीय सहसंचालकांच्या रिक्त पदांवर तात्पूरती पदभरती करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. विभागीय सहसंचालक पदे मोठया प्रमाणावर रिक्त असल्याने त्या त्या विभागीय सहसंचालकांच्या कार्यालयाची कामे प्रलंबित रहात असल्याने सहसंचालनालयांच्या कामावर प्रतिकूल परिणाम होत असून हे टाळण्याच्या उद्देशाने प्रस्तावित नियमाच्या आधारे निवड समितीमार्फत उमेदवारांची निवड करुन पदे भरण्याचा निर्णय शासन मान्यतेने घेण्यात आला. त्यानुसार शासन निर्णय दि. २४.११.२०१० अन्वये सेवानिवृत्त मुख्य सचिव श्री.अरुण बोगिंरवार यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या निवड समितीने गुणानुक्रमे शिफारस केलेल्या व शासनाने शिफारस स्विकृत केलेल्या खालील उमेदवारांची पुढीलप्रमाणे आदेशाच्या दिनांकापासून ३ वर्षासाठी किंवा पुढील निवडसमितीची बैठक होईपर्यंत किंवा लोकसेवा आयोगाकडून उमेदवार प्राप्त होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत तात्पुरती पदस्थापना करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे :-

**<u>शासन निर्णय:-</u>**

राज्य शासनाने स्विकृत केलेल्या निवड समितीच्या शिफारशीनुसार खालील उमेदवारांची विभागीय सहसंचालक, महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ या पदावर त्यांच्या नांवासमोर दर्शविलेल्या रकान्यात ते ज्या दिनांकापासून त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकृत करतील त्या दिनांकापासून ३ वर्षासाठी किंवा पुढील निवड समितीची बैठक होईपर्यंत किंवा लोकसेवा आयोगाकडून उमेदवार प्राप्त होईपर्यंत किंवा इतर कोणत्याही कारणाने त्यांची सहसंचालक पदावरील सेवा संपुष्टात येईल तोपर्यंत यापैकी जे आधी घडेल त्या कालावधीकरिता तात्पुरती पदस्थापना करण्यात येत आहे

| अ.क्र. | नाव व सध्याचे पदनाम | प्रस्तावित विभागीय सहसंचालक पदावर तात्पुरती पदस्थापना |
|---|---|---|
| १ | डॉ.विठ्ठल शामराव मोरे, सहयोगी प्राध्यापक, शासकीय ज्ञान विज्ञान महाविद्यालय, औरंगाबाद | सहसंचालक, मुख्यालय, उच्च शिक्षण पुणे येथील रिक्त पदी |
| २ | डॉ.अंजली रहाटगांवकर, सहयोगी प्राध्यापक, शासकीय विज्ञान संस्था, नागपूर | विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, अमरावती येथील रिक्त पदी |
| ३ | डॉ. मोहन  नामदेव खताळ, सहयोगी प्राध्यापक, शासकीय अध्यापक महाविद्यालय, अकोला | विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, नांदेड (श्रीमती शैला सारंग यांना त्यांच्या शासकीय अध्यापक महाविद्यालय, नांदेड या मुळ पदावर प्रत्यार्पित करुन) |

२. सदर उमेदवारांची सहसंचालक, महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ या १५६००-३९१०० श्रेणी वेतन ७६०० हया वेतनश्रेणीतील पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटीच्या अधिन राहून पदस्थापना करण्यात येत आहे . तथापि पदस्थापित उमेदवार सध्या ज्या वेतनश्रेणीत वेतन घेतात त्याच वेतनश्रेणीत वेतन व भत्ते घेण्यास अनुज्ञेयता देण्यात येत आहे.

१) उपरोक्त उमेदवारांनी कोणतीही रजा न उपभोगता पदस्थापना केलेल्या ठिकाणी दिनांक १६/०८/२०१४ पर्यंत रुजू व्हावे. दि. १६/०८/२०१४ पर्यंत विभागीय सहसंचालक पदावर नियुक्ती न स्विकारल्यास ते सदर पदावर रुजु होण्यास इच्छुक नसल्याचे गृहीत धरुन सदर त्यांचे पदस्थापना आदेश रद्द झाले असल्याचे समजण्यात येईल.

२) कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त करुन तो न राखल्यास किंवा त्यांचे काम असमाधानकारक वा वर्तणूक अयोग्य आढळल्यास, त्यांची पदस्थापना रद्द करण्यात येईल. संचालक, उच्च शिक्षण यांनी प्रस्तुतबाबतचा अहवाल त्वरीत शासनास सादर करावा.

संचालक, उच्च शिक्षण यांनी प्रस्तुतबाबतचा अहवाल त्वरीत शासनास सादर करावा.

३. श्रीमती शैला सारंग, यांचा विभागीय सहसंचालक, नांदेड या पदावरील कार्यभार समाप्त करुन त्यांची पदस्थापना त्यांच्या सहयोगी प्राध्यापक,शासकीय अध्यापक महाविद्यालय, नांदेड या मुळ पदावर प्रत्यार्पित करण्यात येत आहे.

४. डॉ. सुहास कुमार पाटील, प्राचार्य, अध्यापक महाविद्यालय, मुंबई यांच्याकडील सहसंचालक, शिक्षण शुल्क समिती, मुंबई या पदाचा अतिरिक्त कार्यभार समाप्त करुन श्री. उमेश सं. मुरुमकर, सहयोगी प्राध्यापक, शासकीय अध्यापक महाविद्यालय, परभणी यांच्याकडे सोपविण्यात येत आहे.

५. डॉ.मोहम्मद फैय्याज, सहयोगी प्राध्यापक, शासकीय ज्ञान विज्ञान महाविद्यालय, औरंगाबाद यांच्याकडील विभागीय सहसंचालक, औरंगाबाद या पदाचा अतिरिक्त कार्यभार समाप्त करुन डॉ. बी.पी.लहाने, सहयोगी प्राध्यापक, शासकीय ज्ञान विज्ञान महाविद्यालय, औरंगाबाद यांच्याकडे सोपविण्यात येत आहे.

६. डॉ.श्रीमती विद्युलता निळेकर, सहयोगी प्राध्यापक, शासकीय अध्यापक महाविद्यालय, अंबेजोगाई यांच्याकडील विभागीय सहसंचालक, कोल्हापूर या पदाचा अतिरिक्त कार्यभार समाप्त करुन डॉ. आर.एम.कांबळे, सहयोगी प्राध्यापक, राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर यांच्याकडे सोपविण्यात येत आहे.

७. हे आदेश प्राप्त होताच सध्या निवड झालेले अध्यापक ज्या महाविद्यालय/संस्थेत सध्या कार्यरत आहेत त्या महाविद्यालय /संस्थांच्या प्राचार्य/संचालक हे त्यांना नवीन पदी रुजु होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करतील व संबंधित उमेदवार नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होतील. हयाबाबतचा अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे शासनास सादर करतील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१३१४२०५५१६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nivruti Bhaguji Marale

Digitally signed by Nivruti Bhaguji Marale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Nivruti Bhaguji Marale
Date: 2014.08.13 14:19:49 +05'30'

**नि.भा.मराळे**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
४) सर्व विभागीय सहसंचालक (उच्च शिक्षण).

५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
६) सर्व संबंधित जिल्हा कोषाधिकारी,
७) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
८) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
९) मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
१०) कुलसचिव, महाराष्ट्रातील सर्व अकृषि विद्यापीठे.
११) प्राचार्य, सर्व शासकीय महाविद्यालये /संस्था
१२) संचालक, सर्व शासकीय विज्ञान संस्था / भारतीय प्रशासन पूर्व प्रशिक्षण केंद्र, महाराष्ट्र राज्य.
१३) सर्व मंत्रालयीन विभाग,
१४) प्रधान सचिव,उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
१५) सर्व सहसचिव/ उपसचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) सर्व अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई.
१७) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई. (पत्राद्वारे).
१८) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) संबंधित ३ उमेदवार
२०) निवड नस्ती/मशि-१.